संगीत

# वधूपरीक्षा.



हें नाटक

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एल्‌एल्. बी.

संगीत वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार, प्रेमशोधन,

जन्मरहस्य, सहचारिणी, परिवर्तन, शिवपावित्र्य,

या नाटकांचे,

आणि

भारतीय ज्योतिर्गणित व साहित्यसिशी

या पुस्तकांचे कर्ते

यांनीं लिहिलें.

---

तृतीयावृत्ति :

१९३१

---

किंमत १ रुपया.

प्रकाशक — त्र्यंबकेश बळवंत पेंढारकर,
ललितकलादर्श मंडळी.
खेतवाडी मेनरोड, मुंबई.



---

" संगीत वधूपरीक्षा " या नाटकाचा प्रथम प्रयोग ललितकलादर्श नाटक मंडळीनें मुंबई येथें बॉम्बे थिएटरांत गुरुवार ता. ११ आक्टोबर १९२८ रोजीं रात्रौ ८-३० वाजतां करून दाखविला.

---

मुद्रक — पुरुषोत्तम नारायण बर्वे,
मराठा प्रिंटिंग प्रेस,
लॅमिंग्टन रोड, मुंबई नंबर ७.

# आभार

गद्य नाटकांपेक्षां संगीत नाटकें लिहिण्याकडेच मनाचा मूळपासून ओढा असल्यामुळें 'वधूपरीक्षा' संगीत करण्याची कल्पना पुढें येतांच मी आनंदानें तिचा स्वीकार केला. ही कल्पना ललितकलादर्श नाटक मंडळीचे उत्साही मालक रा. रा. व्यंकटेश बळवंत पेंढारकर यांनीं सुचविली. पदांच्या अनेक चाली त्यांनींच गायनाचार्य प्रो. रामकृष्णबुवा वझे यांजकडून देवविल्या व नाटकाचें नवीन छायाचित्रांसह 'नव्या' स्वरूपांत प्रकाशनही त्यांनींच केलें. अपत्याच्या जन्मापेक्षांही त्याच्या पुनर्जन्माचा आनंद अधिक असल्यामुळें या सर्व गोष्टींबद्दल मी त्यांचा व वझेबुवांचा अत्यंत ऋणी आहें.

माझे व्यवसायबंधु रा. रा. नारायण मोरेश्वर सोमण यांनीं नाटकाचा संक्षेप करण्याच्या व पद्यरचनेंत फेरफार सुचविण्याच्या कामीं मला फार मदत केली. तिजबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

माझे स्नेही रा. रा. विष्णु सखाराम खांडेकर यांनीं नाटकाचा संक्षेप करण्याच्या, नाटकांतील पदें दुरुस्त करण्याच्या व नाटक बसविण्याच्या कामीं ज्या सूचना केल्या त्यांबद्दल मी सदैव त्यांचा ऋणी राहीन. त्याचप्रमाणें प्रसिद्ध नाटककार व नट रा. रा. यशवंत नारायण टिपनीस यांनीं नाटक बसविण्याच्या कामीं मला जी मदत केली तिजबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

या आवृत्तीचीं स्थूल मुद्रितें तपासण्याच्या कामीं माझे स्नेही प्रसिद्ध नाटककार रा. रा. भार्गवराम विठ्ठल वरेरकर व माझे व्यवसायबंधु रा. रा. काशीनाथ रावजी ब्रह्म यांची मला फार मदत झाली. या साहाय्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. त्यांच्या अवलोकनांतून ज्या चुका शिल्लक राहिल्या असतील त्यांजबद्दल माझें अंधत्व जबाबदार आहे, असें समजून वाचकांनीं त्याबद्दल क्षमा करावी अशी विनंति आहे.

रा. रा. अनंत रामचंद्र राजाध्यक्ष यांनीं अत्यंत थोड्या अवधींत छायाचित्रें घेऊन तयार करून दिलीं, रा. रा. विठ्ठल दिनानाथ वागळे यांनीं तितक्याच तत्परतेनें त्यांचे ठसे केले, रा. रा. पु. श्री. काळे यांनीं छायाचित्रांच्या कामीं मदत केली व रंगभूमीची सजावटही उत्तम तऱ्हेनें केली, ललितकलादर्श नाटक मंडळींतील नटांनीं उत्साहानें नाटक बसविलें व आपलीं छायाचित्रेंही घेऊं दिलीं, रा. रा. पुरुषोत्तम नारायण वर्दे यांनीं वेळेवर ही आवृत्ति छापून दिली, या सर्वांचा त्यांनीं केलेल्या सहाय्याबद्दल मी आभारी आहें.

प्रयोगांत सोईसाठीं कांहीं फेरफार केले आहेत.

खामगांव, ता. १६-२-३१. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | १२ | नांवाची गुणी | नांवाची सुरेख व गुणी |
| ,, | २१ | ला ठरविल्या | ला स्वस्थपणानें ठरविल्या |
| ४ | ४ | किती तरी | कितीदां तरी |
| ,, | १८ | तुझ्या भावांचे | तुझ्या साऱ्या भावांचे |
| ७ | २० | तरुण | कुलीन |
| ,, | २३ | पालणपोषण | पालनपोषण |
| १० | २ | दुसराहि हेतु | दुसराहि एक हेतु |
| ,, | १९ | तें चालायचें | तें कांहीं चालायचें |
| १४ | २ | पण युवतींच्या | पण या युवतींच्या |
| १८ | ३ | बिलावट | बिलावल |
| ,, | ५ | किरणीं | किरणिं |
| ३५ | २७ | तसेंच दिसत | तसेंच कधींच दिसत |
| ३६ | १६ | सगळयाशीं | सगळयाचा |
| ,, | ,, | माझा | माझ्याशीं |
| ,, | २८ | भर कशी | भर ती कशी |
| ३७ | १० | दोघानीं | दोघांनीं |
| ,, | २१ | तर सौंदर्य | तर तें सौंदर्य |
| ४४ | २ | केली; अखेरीस | केली; तुझ्या वडिलांनीं हुंडाकरणी कबूल केली ती माझ्या वडलांनां पसंत पडली आणि अखेरीस |
| ४५ | २१ | ढोळा | डोळा |
| ४८ | ८ | अजि कां करावें | अजि कां करावें ॥ १ ॥ |
| ४९ | २६ | येईना | येइना |
| ५१ | २१ | तरी | तरि |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ५४ | ७ | यक्सनीची | जखनीची |
| ५७ | २४ | सांगितल्याप्रमाणें भलतें सलतें | सांगितल्या प्रमाणें कांहीं भलतें सलतें |
| ५८ | १३ | आपुल्या वाणीला | आपुल्या रुचे वाणीला |
| ६२ | १६ | मालकावर | माणसावर |
| ७३ | २७ | पन | पण |
| ७४ | १४ | यक्सनी बरूबर | जखनी बरूबर |
| ७७ | ९ | धरुनि | धरुनी |
| ८७ | १८ व १९ | त्रिवेणी—मग आजपर्यंत बरींच निरपराधी मनुष्यें आपल्याकडून दोषी ठरून फासावर चढलीं असतील ! | टीपः—या दोन ओळी अजिबात गाळाव्यात. |
| ९४ | २२ | आत्महुतीचें | आत्महुतिचें |
| ९६ | २५ | आपणाविना | आपणांविना |
| ,, | २६ | जना | जनां |
| ९८ | १४ | झंपताल | झपताल |
| १०७ | २२ | तदर्थ जो | तदर्थ ती |
| १०८ | १२ | समर्द | संमर्द |
| ,, | १३ | कैंचा | कैचा |
| १११ | २६ | तुच्छतेनें टाकलेंस | तुच्छतेनें झिडकारून टाकलेंस |
| ११२ | २१ | सोडित ना ॥ १ ॥ | सोडित ना० ॥ १ ॥ |
| ,, | २२ | सोडित ना ॥ २ ॥ | सोडित ना० ॥ २ ॥ |
| ११३ | २ | लुललुशीत | लुसलुशीत |
| १२८ | १७ | स्वानुभयानें | स्वानुभवानें |
| ,, | २३ | कुणी | कुणि |



**धुरंधर**:—तुम्ही महाराजांना पाहिलें म्हणतां ? ते माझ्यासारखे दिसतात का ?  [ अंक १ ला, पान २६ ]

# वधूपरीक्षा.



## अंक पहिला.

---

**नमन.**

[ विहाग-रूपक. ]

त्या हें नमन करिं हरिला । अतुलबला ॥ ध्रु० ॥
भुजबलें वधि असुरभूपां । धीबलें कधिं कपटकूपां ।
धरित पशुमीनादिरूपां । मनुज कधिं झाला ॥ १ ॥
विविध मायावेष घेई । चढवि ललनारूप देहीं ।
गद्य जणुं संगीत होई । जगद्वनिं सजला ॥ २ ॥

---

### प्रवेश पहिला.

[ राणी, धुरंधर व भार्गव. ]

**राणी**—बाळासाहेब, तुम्हीं विलायतेपासून आपल्या बंदरापर्यंतचा प्रवास आपला इतमाम बाजूला ठेवून सामान्य माणसाप्रमाणें केलात, याव- रून तुमचा विचार काय समजावयाचा ? प्रथम आपली वधू स्वतःच पसंत करायची, आणि नंतर प्रजाजनांना खऱ्या रूपानें दर्शन द्यायचें, असाच ना ? पण मी म्हणतें, तुम्हीं पुन्हा एकवार या गोष्टीचा विचार करा, आणि हें वधू निवडण्याचें काम मजवर न सोंपवितां स्वतःच केलें पाहिजे कीं काय तें सांगा. तथापि वडील माणसांप्रमाणें तरुणांचीहि अशा नाजुक गोष्टींत चूक होण्याचा संभव आहे, हें लक्षांत असूं द्या.

**धुरंधर**—आपल्या आशीर्वादानें चूक होणार नाहीं, अशी मी उमेद बाळगतों. जर झालीच, तर हें राज्याचें गाडें हांकण्यालाहि मी योग्य नाहीं असें सिद्ध होईल. जो राजा अल्लड तरुणीचें अंतरंग पारखूं शकत नाहीं त्याला प्रजेच्या विविध अंतरंगाची काय पारख असणार ? आईसाहेब, आपल्या शिरावरून राज्याधिकाराचा बोजा स्वतःच्या शिरावर घेण्याचें माझें जसें कर्तव्य आहे, तसें मजकारितां वधू निवडण्याच्या जबाबदारींतून आपणाला मोकळें करणें हें नाहीं का ?

**राणी**—बाळासाहेब, तुमच्या प्रेमाच्या हट्टापुढें मला आपला आग्रह सोडणें भाग आहे. देव तुम्हांला या कामीं पूर्ण यश देवो, आणि तुमच्या मार्गांत कांहीं विघ्नें न येऊं देतां मला लवकरच भेटवो ! बरोबर भार्गवाला घेऊन जा. भार्गवा, माझ्या बाळासाहेबांच्या प्राणांची तुझ्याकडे ठेव म्हणून ठेविली आहे. ती मला जशीच्या तशीच परत आणून दिली पाहिजे.

**भार्गव**—बाळासाहेबांनीं आपला हा हट्ट सोडून दिला असता तर आपणाप्रमाणें मलाहि संतोष झाला असता. पण ज्याअर्थीं ते हें काम शिरावर घेत आहेत, त्याअर्थीं डोळ्यांत तेल घालून त्यांच्या कुशलाची काळजी करणें हें माझें कर्तव्य आहे.

**धुरंधर**—आईसाहेब, आपण माझें कोड पुरविण्याकरितां स्वतःची आवडहि बाजूला ठेविली, हे आपले उपकार मी कधीं विसरणार नाहीं.

**राणी**—बाळासाहेब, मी तुमच्या बेताला मान्यता दिली खरी; पण आईचें हृदय माझ्या मनांत नसत्या शंका उत्पन्न करीत आहे. तुमचें खरें स्वरूप जर का उघडकीला आलें, तर तुमचा बेत फसून कदाचित् प्राणांवरहि संकट यायचें. याची कांहीं खबरदारी घेण्याचा तुमचा विचार असेलच ?

**धुरंधर**—आईसाहेब, त्याचाहि बंदोबस्त करण्याची मी अल्पमतीनें एक योजना ठरविली आहे. गेल्या बारा वर्षांत प्रजेपैकीं एकानेंहि मला पाहिलें नाहीं. याच्या शिवाय आपण जर चोहोंकडे असें जाहीर केलें, कीं एक तोतया माझी गादी स्वतःच्या सदृश रूपाच्या साहाय्यानें हिरावणार आहे अशी बातमी आल्यामुळें मला तूर्त विश्वासुक रक्षकांच्या पहाऱ्यांत बंदोबस्तानें ठेविलें आहे व मला भेटण्याची कोणालाहि परवानगी नाहीं. तर

मला कोणींही ओळखण्याची भीति दिसत नाहीं.

**राणी**—आणि वेष कोणता घेणार?

**धुरंधर**—ज्योतिष्याच्या वेषांत मनुष्यस्वभाव अविकृत स्थितींत दिसण्याचा बराच संभव असल्यामुळें तोच वेष घेतलेला बरा. सोंगाची नीट बतावणी करितां यावी म्हणून मी प्रवासांत ज्योतिषाचें ज्ञानही संपादन केलें आहे.

**राणी**—वा:, तुम्हीं अगदीं येथपर्यंत सुद्धा तयारी करून टेविली आहेत ना? शाबास तुमची! पण इतक्या सगळ्या युक्त्या करूनाहि तुम्हांला आपल्या वधूची निवड माझ्या साहाय्यावांचून करता येईल असें वाटत असेल तर ती तुमची चूक आहे कारण वधूसमुद्रांतून अत्यंत उज्ज्वल रत्न शोधून काढणें हें कांहीं सोपें काम नाहीं. म्हणून आपल्या राजधानीच्या मुलींपैकीं राज्ञीपदाला कोण योग्य आहेत, हें मला तुम्हांला सुचवून ठेविलें पाहिजे. आपल्या शहरांत विश्वेश्वरशास्त्री नांवाच्या एका घरंदाज गृहस्थाची गंगू नांवाची गुणी मुलगी आहे. तशीच तिची मैत्रीण यमुना ही देखील वाखाणण्यासारखी आहे. या दोघी नापसंत पडल्या तरच तुम्ही दुसरीकडे ठरविण्याचें माझ्यापाशीं कबूल केलें पाहिजे.

**धुरंधर**—वा:, वडिलांना मान्य अशीच निवड करण्याची संधि आली असतां ती वाया कोण दवडील? आईसाहेब, मी गंगूची पारख करण्याकरितां विश्वेश्वरशास्त्र्यांच्या घरीं ज्योतिष्याच्या वेषानें राहीन; आणि भार्गवाला यमुनेच्या घरीं दुसऱ्या कोणत्या तरी वेषानें ठेवीन. मग तर झालें ना?

**राणी**—असो; आपल्याला अजून बऱ्याच किरकोळ गोष्टी ठरवायच्या आहेत, त्या ठरविल्या पाहिजेत. [ राणी व धुरंधर जातात. ]

**भार्गव**—( स्वत:शीं ) हा भार्गव स्वयंवराचा इतका पक्षपाती व अंधविवाहाचा इतका द्वेष्टा! धुरंधरमहाराजांच्या वधूपरीक्षणाच्या बेतास त्याचा इतका पाठिंबा! बाबांच्या मरणानंतर पोरका झालेल्या या मुलाच्या पालनपोषणाची जबाबदारी संस्थानाकडे आल्यावर त्याला राणीसाहेबांनीं स्वत:च्या मुलाप्रमाणें व धुरंधरमहाराजांनीं आपल्या बंधूप्रमाणें वागवून जे डोंगराएवढे उपकार केले ते यथाशक्ति फेडण्याचा त्याचा इतका निश्चय! परंतु काल हिंदुस्थानच्या भूमीवर पाय ठेवितांच राणीसाहेबांनीं बाबांचें जें हें मृत्युपत्र

माझ्या स्वाधीन केलें त्यानें त्या सगळयावर क्षणांत विरजण पाडिलें. ' माझा मुलगा वयांत आल्यावर हें पाकीट त्याच्या स्वाधीन करावें. ' हें त्यावरील वाक्य वाचतांच माझ्या पोटांत धस्स झालें आणि आंतील मजकुरानें तर माझी सगळी उमेद खचून गेली. कालपासून मी या मृत्युपत्राचीं कितीतरी पारायणें केलीं असतील. पण ज्याप्रमाणें चुकलेलें वासरूं गाईकडे धांवत जातें त्याप्रमाणें फुरसत मिळाली कीं माझे डोळे या मृत्युपत्राकडे धांव घेऊं लागतात. (वाचतो.) ' मुला, हें मृत्युपत्र जेव्हां तुझ्या दृष्टीला पडेल, त्याच्या सत्रा वर्षांपूर्वी विजयादशमीच्या दिवशीं आपल्या घरीं एक अनोळखी गृहस्थ येऊन त्यानें आपली सोन्यासारखी मुलगी व तिच्या खर्चाकरितां सोन्यानें भरलेली एक पिशवी माझ्या स्वाधीन ठेव म्हणून ठेविली. त्याच दिवशीं दुसरा एक नवखा गृहस्थ आपल्या घरीं पांथस्थ म्हणून बिऱ्हाडाला आला. हें पाहून मी दुष्टानें द्रव्याच्या अभिलाषानें व ठेव ठेवणारा लवकर परत येईल या भीतीनें त्या पांथस्थाच्या भिस्तीवर त्याच रात्रीं त्या मुलीला टाकून कुटुंबासह देशांतर केलें. सुदैवानें त्या मुलीच्या गळ्यांतील जस्ती ताईत कवडीमोलाचा म्हणून तसाच राहूं देण्याची मला बुद्धि झाली. असो; मी दुरात्म्यानें या रीतीनें सोनें लुटून व सीमोल्लंघन करून विजयादशमीचा सण पार पाडला ! परंतु न्यायनिष्ठुर दैव कृतकर्माबद्दल प्रायश्चित्त देण्याकरितां परमुलुखांतसुद्धां आपल्यामागें धांवत आलें, आणि त्यानें एकामागून एक तुझ्या भावांचे बळी घेतले. अखेरीस तुझी आईहि त्याच तापाच्या साथींत मरण पावली, व मी अन्यायानें गिळंकृत केलेलें धनहि चोरीस गेलें. ईश्वराच्या न्यायदेवतेनें माझ्या भोंवतालचीं आप्तांचीं कवचें नाहींशीं करून अंतीं मला स्वतःला गांठिलें आहे. हें मृत्युपत्र मी निर्वाणीच्या काळीं लिहीत आहें. वर लिहिलेली हकीकत कदाचित् अजूनही तुझ्या स्मरणांत असेल. बाळा, ज्या मुलीला मी तिच्या पित्यापासून एका हातानें घेऊन दुसऱ्या हातानें तिसऱ्याच्या स्वाधीन करून त्रिस्थळी यात्रा घडविली, त्या मुलीला तुझी धाकटी बहीण समजून तिचा त्या जस्ती ताइताच्या धोरणानें शोध करून तूं तिला शक्य तितक्या वैभवास चढवावें ही माझी अखेरची इच्छा आहे. ती पार पाडण्यासाठींच देवानें तुला वांचविलें आहे अशी माझी मनोदेवता सांगते. जर ती खरी ठरून तूं माझी इच्छा पूर्ण

केलीस तर माझ्या अक्षम्य अपराधांचाहि ईश्वराकडून क्षमा होण्याची मला आशा आहे. जर माझी ही इच्छा सफळ न होतां तशीच राहिली तर तुझ्या पित्यास अनंत काळपर्यंत नरकयातना भोगीत रहावें लागेल. ईश्वर तुला दीर्घायुष्य व सद्बुद्धि देवो!' बाबा, संसाराच्या उंबरठ्यांत मी मोठ्या उमेदीनें पाऊल टाकिलें न टाकिलें तोंच माझ्या शिरावर हा जबाबदारीचा केवढा तरी डोंगर आपण टाकीत आहांत!

[ धनाश्री–त्रिवट ]

**शिरिं भार भारी महा। केंवि वाहूं अजि हा ॥ ध्रु० ॥**
**वयहि अल्प मम। अनुभव तैसा। घोर विषमता हा! ॥ १ ॥**

तप्त सुवर्णावर उमटलेल्या मुद्रेप्रमाणें आपण लिहिलेल्या या सर्व गोष्टी माझ्या तापलेल्या स्मृतीवर लहानपणींच पूर्णपणें उमटलेल्या होत्या. त्यांजवर कालाची धूळ सांचून त्या कांहांशा अस्पष्ट होतात तोंच आपल्या या मृत्युपत्रानें ती धूळ उडवून त्या पूर्ववत् उज्ज्वल केल्या आहेत. एकीकडून माझ्या ताईची सुंदर व केविलवाणी मुद्रा दिसत आहे, व दुसरीकडून आपली अनुतप्त मुद्रा दिसत आहे. बाबा, धुरंधरमहाराजांच्या वधूपरीक्षणाचे कामीं साहाय्य करणें हें जर माझें मुख्य कर्तव्य असलें, तर आपली आज्ञा पाळणें हें माझें आद्य कर्तव्य आहे. सुदैवानें मी धुरंधरमहाराजांचा इतका विश्वास संपादन केला आहे कीं, मी शब्द खर्च केला तर ते माझ्या ताईला या संस्थानाची मालकीण करण्यालाहि तयार होतील. या मृत्युपत्रांतील मजकूर महाराजांना सांगून त्यांना कांहीं दिवस थोपवून धरूं का? छे; पण तें मुळींच इष्ट नाहीं. बाबांच्या दुष्कृत्यांचा हा पाढा तरी मी कोणत्या तोंडानें त्यांना वाचून दाखवूं? तें कांहीं नाहीं. मला स्वतःच्या हिंमतीवर भिस्त ठेऊनच गुप्तपणें माझें शोधाचें काम चालू ठेवलें पाहिजे. [ जातो. ]

---

## प्रवेश दुसरा.

[ प्रयागपंडित व खंडेराव कोतवाल. ]

**प्रयाग०**—कोतवाल, मी महेश्वराच्या देवळाकडे दर्शनाला गेलों होतों, त्यामुळें मला घरीं यायला जरा उशीर झाला. तुम्हांला माझ्याकारितां फार

वेळ तिष्ठत बसावें लागलें नाहीं ना ?

**खंडेराव**—वाडुळ बसूनशान न्हायलों म्हून काय जालं सरकार ? सरकाऱ्च्यात्र कामापायीं बसून न्हायलों का दुसऱ्या कुनाच्या ? येक यिळा ही तायताची प्वार आपनास्नी गवसूनशान दिली, म्हंजी ह्यो भादर सुटला बगा. मातुर गरिबाची सरकारास्नी याद न्हाया व्होवी. न्हाई तर आवाच्या रंगामंदी इसरून जायाच !

**प्रयाग०**—कोतवाल, शुद्धीवर आहांत ना ?

**खंडेराव**—गुना जाला धनीसाब. कशीबी येकांदी फटाकडी अस्तुरी मवधली, तरीबी आपुन ह्या गाडिच्याला इसराल व्हय ? न्हाई न्हाई. ह्ये त आपल्या हातनं कंदीबी न्हाई व्हनार. ज्ये मनुक्ष असं म्हंत्याल त्ये अक्षी लबाड पगा.

**प्रयाग०**—मजबद्दल कोणी कांहीं म्हणतात कीं काय ? म्हणत असल्यास काय म्हणतात तें सांगा पाहूं.

**खंडेराव**—कानत्या त्वांडानं सांगू सरकार ? लई वंगाळ बोलत्याती. आरन आपलं मन आवाळावानी मोटं कराया व्होव.

**प्रयाग०**—तरी पण तें मला कळलेलें बरें.

**खंडेराव**—लोक म्हंत्यात, इक्ता अर्क्षा थ्येरडा जालाया, पन अजून आवा ह्येरली का तरन्यावानी डोळ मिचकावतुया, आन् दुसरबी इस्काच ढंग करतुया. म्यां ह्ये ऐकलं पगा, आन् इकुता ह्यो मरद खवाळला म्हंता का अक्षी इचारू नका पगा. मला असं बी वाटाया लागलं का लोक आपनास्नी असं वंगाळ बोलत्याती, मंग आपुनबी येवावानी हात जोडूनशान् कशापायीं बसा ? आपुनबी लई लई फटाकड्या आवा घ्येराव्या, आन् उडवावा रंग आन् काय ? दारू बी येवी ठासून. ह्यो गडी असा इनाकारन् न्हाई कुनाचं ऐकूनशान् घ्येनार, सरकार. कुनी बोलल त ते करूनशान् दावनारच.

**प्रयाग०**—गळ्यांत जस्ती ताईत असलेली मुलगी शोधून काढण्याची मी जी कामगिरी तुमच्याकडे सोंपविली आहे, ती कशाकरितां असा तुमचा समज आहे ?

**खंडेराव**—कशापायी म्हंतासा ? तिला लग्नाविगर घरी ठिवायापायीं ?

असं कोन त्योक म्हनऊ त्येच्या तोंडावर पालता पायपूस. आपुन तिच्यासंगं लगान लावनार आन् काय ! धनीसाव, आपुन मोट इचारी पगा. आपनास्नी त्या आवाच्या गळ्यामंदी ताईत व्होवा, आन् त्योबी काय म्हंता त्ये जस्ताचा व्होवा. त्येच्या बिगर आपुन न्हाई तिच्यासंगं लगान लावनार. येकांदा दुसरा गडी असता तर येकांदी फटाकडी घेऊनशान् घालायचा घरांत, आन् मंग अडकावायचा ताईत गळ्यामंदी !

**प्रयाग०**—कोतवाल, मीं आजपर्यंत माझ्या चरित्रांतील जें रहस्य मनांतल्या मनांत दाबून ठेविलें होतें, तें मला या तुमच्या कुशंका ऐकून सांगणें भाग आहे. शिवाय तें तुम्हांला सांगितल्यावांचून गत्यंतर नाहीं अशी वेळ आली आहे. मात्र हें रहस्य कोणापाशीं न सांगण्याचें मला तुम्हीं वचन दिलें पाहिजे.

**खंडेराव**—या पायावर हात मारूनशान् सांगतों सरकार, आंदी माझा परान जाईल, आन् मंग ह्ये गुपित वटाभाईर निगल.

**प्रयाग०**—ऐका तर मग. येत्या विजयादशमीला अठरा वर्षे पुरीं होतील. त्यावेळीं माझी प्रिय पत्नी निवर्तून फार थोडे दिवस झाले होते. ज्या मुलीचा शोध तुम्ही माझ्या सांगण्यावरून करीत आहांत ती आमचें एकुलतें एक अपत्य. तिला जन्म देतांदेतांच माझ्या कुटुंबाचा अंत झाला. मुलगी अगदीं नक्षत्रासारखी होती. पण ही कपाळकरंटी आपल्या स्त्रीच्या नाशास कारण झाली, असें वाटून मी तिचा त्याग करण्याचा निश्चय केला, व पत्नीच्या अस्थि घेऊन क्षेत्रास जाण्याकरितां निघालों. बरोबर मुलीला घेतलें होतेंच. वाटेंत एक लहान खेडें होतें, तेथें एक तरुण व कुटुंबवत्सल पण गरीब ब्राह्मण रहात होता. त्याच्या स्वाधीन विजयादशमीच्या मुहूर्तावर ती सोन्यासारखी मुलगी केली, आणि नंतर मी तीर्थयात्रा करण्याकरितां निघालों. मुलगी स्वाधीन करितांना मीं त्या ब्राह्मणास तिचें पालणपोषण करण्यास पुरून उरेसें द्रव्यहि दिलें होतें. पण न जाणो कदाचित् ब्राह्मणाची बुद्धि फिरावयाची, आणि तों द्रव्य गिळंकृत करून वर मुलीचा त्यागही करावयाचा, अशी भीति वाटून व तसें झाल्यास मुलगी पुढें ओळखतां यावी म्हणून मी एका कागदावर एक सांकेतिक आकृति काढून त्याचा अर्धा तुकडा एका जस्ती ताईतांत घालून आणिला होता, तो ताईत मुलीच्या गळ्यांत अडकावून दिला, आणि दुसरा तुकडा

मजपाशीं ठेविला. कळलें का मीं काय म्हटलें तें ?

**खंडेराव**—व्हय व्हय, अक्षी नामी हुरेल.

**प्रयाग०**—यात्रा करून परत येतेवेळीं मुलीचा त्याग केल्याबद्दल मला पूर्ण पश्चात्ताप झाला व तिला त्या ब्राह्मणापासून मागून घेण्यासाठीं त्या खेड्यांत आलों; तों काय ? सर्व सामसूम ! ब्राह्मण बाहेरगांवीं पळून गेला असें कळलें. देवानें माझ्या निष्ठुरपणाबद्दल हें योग्य शासन केलें असें मला वाटलें. मी शहरांत परत आलों. राणीसाहेबांनीं मेहरबानीनें मजकडे पूर्ववत् न्यायाधीशाचें काम चालू ठेविलें. पण त्यांना काय माहित, कीं न्यायासनासमोर येणाऱ्या गुन्हेगारांपेक्षांहि नीच असा पुरुष त्या गुन्हेगारांचा न्याय करीत आहे ! बाहेरून जरी मी लोकांस भाग्यवान् वाटें, तरी मी आंतून पश्चात्तापानें करपून जात होतों. कोतवाल, माझें वय मी दिसतों त्यापेक्षां वीस वर्षांनीं तरी कमी आहे. हीं वार्द्धक्याचीं चिन्हें आंतील शोकाग्नीचा परिणाम होत. चेहऱ्यावरील या सुरकुत्या त्या शोकाग्नीच्या तापामुळेंच पडलेल्या आहेत, व केसांची ही पांडुरता त्या अग्नीची रक्षाच होय. धुरंधरमहाराज विलायतेहून परत येऊन लग्न करणार, ही बातमी कानांवर आली तेव्हां तर माझ्या मनःसंतापाची परमावधि झाली; आणि मी माझ्या बाळेचा शोध लावण्याच्या खटपटीला जारीनें लागलों. या कामीं मीं तुमची योजना केली, आणि स्वतःहि रोज देवळाकडे खेपा घालून तेथें जमलेल्या मुलींच्या गळ्यांतील अलंकार निरखून पाहूं लागलों. त्याचा काय परिणाम झाला हें तुम्हांला माहीत आहेच. वास्तविक पाहतां मी त्या सर्व मुलींकडे केवळ पितृप्रेमानेंच पहात होतों. असो, तुमच्याबरोबर तुर्कोच राणीसाहेबांना देण्याकरितां म्हणून मी जें पत्र दिलें होतें, त्यांतहि त्यांना कांहीं दिवस बाळासाहेबांच्या लग्नाचा बेत तहकूब करण्याविषयीं विनंति केली होती. ही गोष्ट तुम्हांला माहित नसेलच ?

**खंडेराव**--कशी म्हाईत असनार, सरकार ? आमी म्हंजी अक्षी बऱ्याचीं गाडवं. साकार भरा न्हाईतर उकिरडा भरा.

**प्रयाग०**--आज दुंदुभिपत्राचा हा ताजा अंक हातीं पडला, त्यावरून माझ्या बाळेचा शोध लागण्याची आशा वाटूं लागली आहे.

**खंडेराव**--प्वार गवासली असं लिवलया व्हय त्येच्यामंदी ?

**प्रयाग०**--इतकें सोपें तें काम नाहीं. त्यामध्यें फक्त ही जाहिरात आली आहे. ही वाचली म्हणजे तुम्हाला कळून येईल मी काय म्हणतों तें.

**खंडेराव**—मी हकड येताइळला आरशी इसरलो आनाया. न्हाईतर वाचूनशेनी पगितलं असतं.

**प्रयाग**—मी वाचतों ऐका:—' सत्रा वर्षांपूर्वी विजयादशमीचे मुहूर्तावर एका इसमानें एक अमोल ठेव दुसऱ्याच्या स्वाधीन केली. त्या दोन इसमांपैकीं एकादा येर्थील स्मशानांत शनिवारीं मध्यरात्रीं आल्यास त्यास मोठा लाभ प्राप्त होईल. ती ठेव अंतीं एका राजकुलीनास मिळणार आहे. म्हणून राजकुलीनांनीं कोणत्याही महत्त्वाच्या बाबतींत घाई करूं नये. '

**खंडेराव**—माज्या तर योक सबूदबी न्हाई ध्येनांत आला. पन इक्तं मातुर खरं का ह्येच्यामंदी दगा हाय. रातच्या पारीं मसनवटींत न्येऊनश्यान् गडाप करन्याचा ब्योत दिसतुया येकांद्या येताळाचा.

**प्रयाग०**—खालीं ' वेताळ ' म्हणून सही केली आहे खरीच.

**खंडेराव**—इक्ती वरसं कोतवालचाकरी करतुया म्हून कंदीकंदी डोकशामदून इक्ती नामी युगत निगतीया.

**प्रयाग०**—पण तुमचा बाकीचा तर्क मात्र सपशेल चुकला.

**खंडेराव**—नसल येताळ तर हडळ असल. योकच. त्येचाच बा त्यो.

**प्रयाग०**—नाहीं, तसेंहि नाहीं. ही जाहिरात देणारास माझ्या बाळेचा पत्ता जरी माहीत नसला तरी मला चांगली मदत करण्याइतकी तिजबद्दल माहिती तरी त्यास खास आहे.

**खंडेराव**—मंग काय इचार ठरतुया सरकार ?

**प्रयाग०**—विचार काय ठरायचा त्यांत ? तुम्ही शनिवारीं रात्रीं याचा छडा लावण्यासाठीं स्मशानांत गेलें पाहिजे.

**खंडेराव**—( एकीकडे ) अगबया ? इक्त्यामंदीच माज हातपाय प्येंडुळल ! ( उघड ) न्हाई सरकार, ह्ये काम आपनास्नीच ग्वाड दिसतं. प्वार आपली, तवा आपुनच जानं ह्ये चखोट. मी पल्डों गरीब मानुस. तिनं बाबा म्हून माज्याच गळ्याला मिटी मारली तर त्ये लोकांमंदीबी ग्वाड न्हाई दिसनार.

**प्रयाग०**—स्मशानांत कशाला मरायला येतात लोक? तुम्हांला पुढें करण्यांत माझा दुसराहि हेतु आहे. त्या मुलीचा बाप मी आहें, हें जर उघड झालें तर एखादा भामटा खोटीच मुलगी माझी म्हणून मजवर लादायचा. धुरंधरमहाराजांचा तोतया उभा राहिला, तसाच प्रकार येथेंहि व्हावयाचा. तें कांहीं नाहीं. तुम्हीच त्या मुलीचा बाप म्हणून पुढें आलें पाहिजे, आणि त्याकरितांच मी तुम्हांला सर्व इत्थंभूत हकीगत सांगितली ती.

**खंडेराव**—लई म्हेरबानी जाली आपली. पन ह्ये समदं हुयाचं कसं? मसनवाटीमंदी जितपनी जायाचा माजा कंदीबी इचार न्हवता. माज्या हातन इक्ती मानसं फासावर चल्ढ्यांत आन् भुतं झाल्यात, का त्यो तत ग्येला म्हना, का समदी भुतं खिनामंदी चटनी करूनश्यान् टाकत्याल.

**प्रयाग०**—कोतवाल, तुम्ही असे भित्रे असाल अशी मला कल्पना नव्हती.

**खंडेराव**—ह्यो मरद तसा भियाबियाचा न्हाई, सरकार. फकत इकूताच इचार मनांत आला व्हता, का कुनालाबी सोबत घिऊन–तसं न्हव, सोबतीला कुनालाबी घिऊन–तसंबी न्हव–कुनाबी भित्र्या भागूबाईसंगाट सोबत म्हून मी ग्येलो तर काइबी वंगाळ न्हाई ना?

**प्रयाग०**—छे छे छे. तुमच्याबरोबर तर कोणीच असतां कामा नये.

**खंडेराव**—माज्यासंगं कोनो असं न्हाई मी म्हंगालों, कोनाबी संग मी ह्ये म्हंगालों.

**प्रयाग०**—शब्दांची फिरवाफिरव करून अर्थ थोडाच बदलतो! तें चालायचें नाहीं, तुम्हीं एकटेच गेलां पाहिजेत.

**खंडेराव**—( एकीकडे ) मी जाइल येकटा. पन भूतं करत्यालना मला दुकटा आन् तिकटाबी.

**प्रयाग०**—कोतवाल, या कामांत तुमची कोणतीहि कसूर दिसतां कामा नये. तुमच्या सुस्तीबद्दल आजपर्यंत तुम्हांला अनेकदां ताकिदी द्याव्या लागल्या आहेत. या वेळीं तरी निदान तसला प्रसंग येऊं देऊं नका. हें आणि त्या तोतयाचें काम नीट बजावाल, तर बक्षीस मिळून अधिक योग्यतेलाहि चढाल. न बजावाल तर मात्र नोकरीला मुकावें लागेल.

**खंडेराव**—( एकीकडे ) इचिभनं कसं करावं आतां? लइ पचाईत आलिया.

(आठवल्यासारखें करून) हां, ही युगत लई नामी शिरप्यालाच दामटावा आन् काय ? म्येला त ब्याद ग्येली ! (उघड) ठीक हाय, सरकार. आपला हुकूम परमान. सरकार, माझा पोरगा आजवर व्हता गांवीं. त्येला माज्या मनांतून द्यायचा हाय सरकारच्या दिमतीला.

**प्रयाग०**—तुमचा मुलगा ? तुम्हाला मुलगा असल्याचें माझ्या कधीं ऐकण्यांत नव्हतें.

**खंडेराव**—माजा म्हंजी माज्या कारबारनीचा, सरकार.

**प्रयाग०**—तुमचा काय आणि तुमच्या कारभारणीचा काय, एकच नाहीं का ?

**खंडेराव**—तसं न्हव सरकार. माज्या कारभारणीचा पहिल्या दादल्याचा त्यो ल्योक. आला गाईमागून वासरावानी.

**प्रयाग०**—असें !

**खंडेराव**—भाईर बसलाय ! हंगूं त्येला आमंदी ?

**प्रयाग०**—आम्हाला चांगल्या कुलीन तरुणांची फार गरज आहे. आणा त्याला आंत.

**खंडेराव**—सरकारची कुरपा. (आंत जाऊन श्रीपतीस आणतो. श्रीपती मुजरा करतो.) ल्योका, वाइच वांकून मुजरा क्येलास तर प्येकाट मोडल व्हय ? असा कटाळा करून कसं चालल ? मनामंदी नसलं तरीबी गरिबीचं स्वांग घ्याया व्हावं. (श्रीपति लवून मुजरा करतो.)

**प्रयाग०**—मुलगा सरळ दिसतो.

**खंडेराव**—अक्षी सरळ हाय बगा येळूच्या काटीवानी. वाकला तर तुकडाच पडल जनु ! पोरा, सरकारची अशी चाकरी करतुस कीं यंव ! मंग त्यामंदी भुताच्या हातून मरान आल तरीबी बंगाळ न्हाई.

**प्रयाग०**—बरें आहे, तुम्ही जा आतां. शनिवारीं रात्रीं घडलेलें वर्तमान कळविण्याला मजकडे रविवारीं सकाळीं या.

(पडदा पडतो. खंडेराव व श्रीपति बाहेर येतात.)

**खंडेराव**—ऱ्ये बग पोरा, खोटपनाची पहिली पकड त तुला दावूनशान् दिली न्हव ? शेरामंदी त्येच्या बिगार येक खिनबरबी चालायचं न्हाई.

**श्रीपति**—ये त मला लई बंगाळ गवासतया.

**खंडेराव**—बगून घ्या पोराचं श्येनपन ! आपल्या बाला शिकवतुया ! पोरा, तुला ख्वोट बोलनं बंगाळ वाटतं व्हय ? घे तर मंग त्येच शास्तार. ज्येला ख्वोटं बोलायचं, त्येनं आदी मनाला इटकावं का मी खोटं बोलतो म्हून्, आन मंग लावावा सपाटा. म्हंजी मग त्येच्यामंदी पाप कुटं ऱ्हायलं ? मी रातदिन असंच करतुया.

**श्रीपति**—बाबा, ह्ये न्हाई माज्या बाच्यानं व्हनार.

**खंडेराव**—तुज्या बाच्यानं व्हतं म्हून तर मी तुला सांगतुया. आन् तूं म्हंगतोस व्हनार न्हाई म्हून. बापापुनवी ब्येटा श्येना.

**श्रीपति**—मी अक्षी उगडउगड सांगतुया--

**खंडेराव**—ह्ये काय ग्येका, ख्येडगळावानी उगडंन् नागडं करीत बसला हैस ? शेरच्या इद्वानावानी सपस्ट असं म्हन. ह्येलाच सवंस्कुत्र म्हनत्यात. बंगाळ असलं तरीबी त्ये सवंस्कुत्रामंदी म्हंतलं मंजी ग्वाड दिसतं. आपुन अन्याव म्हनतो न्हव, त्येलाच त्ये बोलींत म्हनत्यात न्याव ! अग्यानाला म्हनत्यात ग्यान आन् इस्कुलाला बी म्हनत्यात स्कूल ! असा त्येंचा समदा उपराटा परकार ! म्हून बंगाळ काम करावं म्हराटीमंदी आन् ब्वोलावं सवंस्कुत्रामंदी, मंजी थेवाम्होर त्येच समद गुन्ह माफ ! आपला समदा धरम हाय सवंस्कुत्रामंदींच.

**श्रीपति**—हत समदीं बंगाळच कामं कराया व्होवांत म्हनतां ?

**खंडेराव**—अडानी र अडानी ! अक्षी बिचाकला प्वोर. प्वोरा, तुला चखोट काम व्होवं म्हनतुयास ? थांब वाईच. आलं माज्या ध्येनांत. ह्ये पग, तुला परथम वागावानी धीट कराया व्होवं. आसं न्हाई क्येलं तर मंग म्होर भागूबाई व्हयाचा ! त्वां कंदी मसनवाट पगितली हैस ?

**श्रीपति**—आन् रोजच्यारोज पगतुया न्हव का ?

**खंडेराव**—ही ख्येड्यांतली मसनवाट न्हव; शेरामंदली हाय ! हत थेताळ, राकुस, हडळी, डकनी आन् जखनी, उपराट्या पायानी रातचा नाच नाचत्यात, आन् मनुक्षाला गट करत्यात. ख्येड्यावानी गरीब भुतं हतं न्हैती.

**श्रीपति**—मंग तर हतं लई गंमत पगाया गवासनार आमास्नी ! म्या

तर कंदीबी भूत पाघलं न्हाई.

**खंडेराव**--तुला भ्या न्हाइ वाटायचं ?

**श्रीपति**--आन् भ्या त्ये कशापायीं ?

**खंडेराव**--अक्षी ख्येडगळ हैस ! भ्येवं कशाला त्येबी तुला ठावं न्हाई ! थू: तुज्या जिनगानीवर ! पन् ह्येबी ठीक जालं ! परवां श्येनवारीं मद्यान्-रात्च्या पारीं तुला मसनवटांत जाया व्होवं.

**श्रीपति**—मी तर सांजपुनच ततं जाऊन बसतों.

**खंडेराव**—ह्ये तर समद्यापुन ब्येस ! ह्ये बग ततं कोन येतया, काय बोल. तया ह्ये ध्यान ठिवून बगून घ्ये, आन् अक्षी प्हाटंच मला येऊनश्यान् सांग.

**श्रीपति**--आन् मद्रातीच्या भरवख्तीं मला झ्वाप लागली तर मंग कसं?

**खंडेराव**—मसनवाटींत तुला झ्वाप लागल व्हय ? अन् तूं डोकसं कशाला ठ्येवनार ?

**श्रीपति**—आन् ततं अर्देमुर्दे जळल्याल मुरद कमीच असत्याल !

**खंडेराव**—वार माजा वाग ! सोबतुयास खरा माजा ल्योक ! आतां मी सांगतुं तसं कर. मद्यानीपोतुर उब्याउब्यानं न्हाउनश्यान् मसनवाटींमंदी प्हारा कर, आन् कोन काय करतया त्ये ह्येरूनश्यान् ठ्येव ! आन् मंग उशापायध्याप व्होव तिकृत मुडद घ्येउनश्यान् खुशाल मुड्यावानी निजून न्हा ! थंड वाजाया लागली तर एकाद्या मुड्याच कांबरूनबी कर; माजी ना न्हाई. पर हो, ह्ये पग येवडं ध्येनांत ठ्येव ! कुनाला उमगूं द्येऊं नग का ततं मी है का तूं हैस आसं. मीच ततं हाय जनू !

**श्रीपति**—त्येची काई फिकर न्हाई बगा ! तोंडावरन येकांदा मुडदा घ्येतला का काम श्याप ! ( स्वगत ) कुनाच्या बालाबी उमगायचं न्हाई का ती मुड्याची कळा हाय का माज्या बाची सूरत हाय ! [ जातात. ]

---

## प्रवेश तिसरा.

[ धुरंधर व भार्गव. ]

**धुरंधर**—भार्गवा, गेले चार दिवस रोज संध्याकाळीं मी विश्वेश्वर-शास्त्र्यांच्या कुटुंबाबरोबर नेमानें या देवळाकडे येतों आहें, तेव्हां कोठें आज

तुझी गांठ पडली.

**भार्गव**—महाराज, आपणाप्रमाणें मीसुद्धां आपल्या भेटीची संधि मिळावी म्हणून यमुनेबरोबर रोज सायंकाळीं येथें येत होतों. पण युवतींच्या विशाल समुदायांत एकमेकांची गांठ पडावी कुठून ! आपल्या संस्थानांतील झाडून साऱ्या उपवर मुली या शहरांत गोळा झाल्या असल्या पाहिजेत ! या साऱ्या भावड्या मुली संस्थानिक आपल्याच वांट्यास यावा म्हणून बिचाऱ्या रोज देवास नवस करीत आहेत व त्याचे उंबरठे झिजवीत आहेत. त्यांच्या आया रोजचेरोज एकीकडे त्यांचीं मस्तकें परोपरीच्या अलंकारांनीं नटवीत आहेत; व दुसरीकडे शंकराच्या मस्तकावर अभिषेकाचा मारा करीत आहेत; एकी-कडे मुलींच्या हातांत सुवर्णाचीं व रत्नांचीं कंकणें घालीत आहेत, तर दुसरी-कडे देवाच्या दलालांच्या मुठी सुवर्णानें व रत्नांनीं भरीत आहेत; एकीकडे मुलींच्या भालप्रदेशावरील कुंकुमतिलक कोरण्यांत प्रहरानूप्रहर घालवीत आहेत, व दुसरीकडे त्यांच्या भालीं काय लिहिलें आहे हें आपणांसारख्या एकाएकीं प्रसिद्ध झालेल्या ज्योतिषाकडून वाचवीत आहेत ! याप्रमाणें मानवी व दैवी उपायांचा अवलंब करितांना बिचाऱ्यांच्या ध्यानींमनींहि येत नसेल कीं, मुलींचें भविष्य बिनचुक सांगणारा हा जो ज्योतिषी आपणांसमोर दिसत आहे त्याच्या अंगीं त्यांचें भविष्य ठरविण्याचीहि शक्ति आहे; व केवळ दैवाच्या रेषा पहाण्याकरितां जो हात किंचित् काळपर्यंत आपण त्याच्या हातीं देत आहोंत तोच कायमचा दिल्यास मुलीच्या सुदैवाची परमावधि होईल.

**धुरंधर**—भार्गवा, या छद्मवेषानें या भोळ्या मुलींना फसवून मी महा-पातक करीत आहें, असें मला दिवसांतून कितीतरी वेळां वाटतें. पण तसें केल्यावांचून गत्यंतर नाहीं असेंहि लागलीच वाटूं लागतें.

[ हमीर—आडा चौताल. ]

**ललना वितरिल काशि परजनिं ।**
**हृद्गत जें अतुल विभव तिज ॥ ध्रु० ॥**
**जात्या संकोचवती । संस्कारें विनयमूर्ति ।**
**त्यांत नृपतिभय कुठुनि कथिल मन मज ॥ १ ॥**

**भार्गव**—आपण ज्या भाग्यशाली वधूस पट्टराणी करणार तिला या योजने-

पासून विशेष सुख होईल म्हणतां? नांवच नको! कारण आपली निवडणुकीची पद्धतच मुळीं एकांगी. आपण आपल्या आवडीनावडीकडे काय तें लक्ष देणार. पण आपण तिला आवडत आहांत कीं काय, याकडे आपलें अगदीं दुर्लक्ष्य असणार!

**धुरंधर**—भार्गवा, मी स्वत: वधू निवडण्याचा जो विचार केला आहे तो तुला पसंत नाहीं असें दिसतें. मी हा वेश घेण्याचें मुख्य कारण हेंच कीं, माझ्या निवडीच्या वधूला मी आवडतों कीं नाहीं हें मला नीटपणें कळून यावें. मी राजा म्हणून जर मागणी केली असती तर या सगळ्या जणींनीं मजबद्दल तोंडदेखली पसंती व्यक्त केली असती. पण या वेषांत तसें होण्याची भीति मुळींच नाहीं.

**भार्गव**--नाहीं खरीच. कारण या वेषांत आपण एकीलाहि पसंत पडणार नाहीं. आपण धुरंधरमहाराज आहांत हें मला माहीत आहे. पण ज्यांना म्हणून तें ज्ञान नाहीं अशा मुली अशा डौली ज्योतिष्यावर भाळतील असें माझ्या अल्प बुद्धीला वाटत नाहीं. या पोरी हल्लीं ज्योतिष्याला मान देतात तो साधन म्हणून. पण तोच ज्योतिषी साध्य म्हणून त्यांच्यापुढें मांडला तर त्या त्याला ताबडतोब झिटकारून टाकतील. शिवाय जे गुण राजाच्या वेषांत आपणांस शोभतात ते ज्योतिष्याच्या वेषांत नडतील मात्र.

**धुरंधर**—मला हल्लीं जो अनुभव येत आहे त्याचें तूं बरेंच हुबेहूब वर्णन केलेंस खरें.

[ सारंग-त्रिवट. ]

**ज्या स्थानिं शोभत जो गुण। सुटतां तें तो वैगुण्य ॥ ध्रु० ॥**
**नटवर्गीं गुण गणिति वंचना। इतरिं परि न ती हो मान्य ॥ १ ॥**
**मौनयुक्त मुनि मानार्ह गमे। चारण परि पटुताशून्य ॥ २ ॥**

**भार्गव**—बरें, आपण आज चार दिवस गंगूताईचें निरीक्षण करीत आहांत. आपला त्यांजबद्दल काय ग्रह झाला आहे?

**धुरंधर**--तिचें रूप खरोखर अद्वितीय आहे. तिला निर्माण करितांना ब्रह्मदेवानें आपलें बुद्धिसर्वस्व खर्ची घातलें असलें पाहिजे. आतां तिच्या अंगीं जरा अभिमान आहे खरा. पण तो दोष कालानें जाण्यासारखा आहे.

**भार्गव**--( हंसून ) अप्रतिम रूपाच्या तेजानें मोठमोठ्या दोषांनाहि लोप-वून टाकिलें ! तथापि ज्याअर्थी हा दोष दिसण्याइतकी तारतम्यबुद्धि आपल्या अंगीं अजून राहिली आहे, त्याअर्थी गंगूताई आपल्या स्वामिनी होणार नाहींत हें भविष्य मी आजच सांगून ठेवितों.

**धुरंधर**--भविष्यवादीपणांत मला स्थानभ्रष्ट करण्याचा तुझा इरादा दिसतो. तुझें यमुनेबद्दलचें कसें काय मत झालें आहे ?

**भार्गव**—गंगूताई जर विधात्यानें बुद्धिसर्वस्व खर्चून उत्पन्न केल्या असतील, तर यमुनेस त्यानें कल्पनासर्वस्व खर्चून निर्माण केलें असलें पाहिजे. कारण असे अवयव कल्पनेच्या भरारींतच निघणें शक्य आहे.

**धुरंधर**--( एकीकडे ) गंगूस उद्देशून बोलतांना यानें ताई हें उपपद लावलें, पण यमुनेचा निर्देश साध्या नांवानेंच केला. याचें ईंगित काय असावें बरें ? अत्यंत औदासीन्य किंवा निःसीम प्रेम ? याच्या वर्णनावरून औदासीन्य नसेलसें वाटतें. एकूण वधूपरीक्षेचें काम स्वतःशिवाय इतर तरुणाकडे न सोंपविणेंच बरें. ( उघड ) भार्गवा, तुला सुद्धां सौंदर्याच्या वर्णनांत दोषांचें भान राहिलें नाहीं असें दिसतें. शिवाय यमुनेचें निरीक्षण तूं माझ्या वतीनें न करितां स्वतःकरितांच करीत होतास असेंहि दिसतें.

**भार्गव**--यमुनेला पाहण्यापूर्वीच आपणाला मजबद्दल मत्सर वाटूं लागला वाटतें ? पण अजून मी दोषांचा पाढा कुठें वाचला आहे ? तो ऐकिला म्हणजे आपला मत्सर अस्थानीं आहे अशी आपली खात्री होईल. एक तर यमुनचा स्वभाव पराकाष्ठेचा हट्टी आणि हेकेखोर.

**धुरंधर**--( एकीकडे ) अजून भार्गवास यश मिळालेंसें दिसत नाहीं.

**भार्गव**--एकदां तिच्या डोक्यानें एखादी गोष्ट घेतली, कीं ब्रह्मदेवाच्यानें सुद्धां ती बदलणें शक्य नाहीं. अशा प्रसंगीं तिची भ्रुकुटि वक्र होऊन तिचे दंत अधरास खिळवून टाकितात, ती शोभा अवर्णनीय दिसते.

**धुरंधर**—(एकीकडे) यमुनेचें प्रेम आकर्षून घेण्यांत याचा कांहीं हेतु असेल का ? ( उघड ) भार्गवा, मीं स्वतः वधू निवडण्याचा जो विचार केला आहे, तो तुला पसंत नाहीं असें मला वाटावयाला बरींच कारणें झालीं आहेत. आजपर्यंत परदेशीं सुद्धां तूं मजवर बंधूप्रमाणें निर्व्याज प्रेम करून मला अनेक



**प्रयाग:**—तुम्ही शनिवारीं रात्रीं याचा छडा लावण्यासाठीं स्मशानांत गेलें पाहिजे

[ अंक १ ला, पान २ ]

संकटांतून सोडविलेंस, तें प्रेम हिंदुस्थानचा वारा लागल्याबरोबर मालवलें कीं काय ? तुझी माझ्या बेताला इतकी प्रतिकूलता कां असावी ?

**भार्गव**—सांगूंच आपणाला ? महाराज, गंगूताई आणि यमुना या जिच्या दासीहि शोभणार नाहींत अशी एक वधू मला माहित आहे. गंगूताईस निर्माण करून विधात्यानें आपल्या बुद्धिवैभवानें एक कूट सोडविलें, व यमुनेला निर्माण करितांना त्याची विशाल कल्पना एक सुंदर स्वप्न रचीत होती, असें म्हणतां येईल. पण मीं ज्या वधूचें नुकतेंच वर्णन केलें ती त्याच्या कल्पनेंतून निघालेली व बुद्धीनें रेखलेली काव्यकृतिच होय, यांत शंका नाहीं.

**धुरंधर**—मग तिला दाखविण्यास विलंब कशाला ?

**भार्गव**—योग्य वेळीं मी ती आपल्या दृष्टीस पाडीनच.

**धुरंधर**—असो; आपणांला येथून लवकरच हललें पाहिजे. आपल्या सोबतिणी आपली वाट पहात असतील. शिवाय हा वृद्ध गृहस्थ टेहळणी करीत इकडेच येत आहे. त्याच्या कानावर आपलें संभाषण जाऊन उपयोग नाहीं.

**भार्गव**—त्याचें लक्ष्य आपणाकडे आहे कुठें ? स्वारी येथील युवतींचीं मुखें निरखण्यांत दंग झाली आहे. हे गृहस्थ येथील न्यायाधीश आहेत म्हणून ऐकतों. पण न्यायापेक्षां रूप निवडण्याच्या कामांतच स्वारींची कुशाग्रबुद्धि अधिक खर्ची पडत असली पाहिजे. स्वारी रूपनिरीक्षणाच्या नादांत अगदीं आपल्या अंगावरच आली. चला तर येथून. [ दोघे जातात. ]

**भार्गव**—( पडद्याबाहेर येऊन स्वतःशीं ) ताई, या अवाढव्य जगांत तुला कोठें शोधूं ? तूं असशील तरी कोणत्या स्थितींत ? तुझा वास सुंदर महालांत असेल कीं भिकार झोंपड्यांत ? तुला सुग्रास अन्न खावयास मिळत असेल कीं वाळलेलें कदन्न ? जर तूं दुःखाच्या दरींत पडली असशील, तर तुला सुख-पर्वताच्या अत्युच्च शिखरावर बसविण्याचें मला सामर्थ्य आहे. पण तुझें वास्तव्यच माहित नसल्यामुळें मी पंगूपेक्षां पंगु बनून गेलों आहे. या रमणी-गणाप्रमाणें तुलाहि राज्यलालसेनें आकर्षून येथें आणिलें असेल का ? पण तसें असेल म्हणावें, तर तुझें लावण्यरत्न या हिरकण्यांमध्यें लपून कां रहावें ? चंद्र आकाशांत पूर्ण तेजानें तळपत असतां त्याला शोधण्याकरितां अंधारांत

वांचपडत जावें लागतें का? का तुम्ही प्रागज्योतिच मालवली असें मी समजूं? तसें झालें असेल तर माझ्याहि आयुष्याची इतिकर्तव्यता संपली.

[ बिलावट-त्रिवट. ]

**मति कुंठिता आति चिंतितां । न कळत वदनचंद्र ठायें कवण**
**निजकिरणीं गेह करित रम्य उसळवि हृदयजलधि भंवता ॥ धृ०॥**
**संकटराहु तया ग्रासी का । लपोनि छपोनि अधमकुमतिघन ।**
**छळुं सजाते सतत मधुनि मधुनि सर्वथा ॥ १ ॥**

असो, असे हातपाय गाळून कांहीं उपयोग होणार नाहीं मी येथील 'दुंदुभि' पत्रांत जी जाहिरात दिली आहे, तिचा उपयोग माझ्या ताईचा पत्ता लावण्यांत बराच होईल. त्वरित व खात्रीचा असा हा शेवटचा उपाय कितपत सिद्धीस जातो हें पहावयाचें आहे. [ जातो. ]

---

## प्रवेश चवथा.

[ धुरंधर, वाराणशी, गंगू, यमुना, त्रिवेणी. ]

**वाराणशी**—अहो जोशीबुवा, तुमच्या भाकितावद्दल आज सगळें शहर वाखाणणी करीत आहे. पण तुमच्या चातुर्याचा आम्हांला मात्र अजून मासला पहावयाला मिळाला नाहीं.

**धुरंधर**--याचें एक कारण असें, कीं आपल्या मुलीसारख्या ज्या अद्वितीय सुंदर युवति असतात त्यांच्या हातांवरील रेषांपेक्षां रूपरेषेवरूनच त्यांच्या भावी उत्कर्षाची अटकळ बांधितां येते; व तें काम सामान्य जनांसहि साध्य असतें. दुसरें असें, कीं ज्याप्रमाणें वैद्याला आपल्या आप्तांची रोगचिकित्सा शांत व निश्चल बुद्धीनें करितां येत नाहीं, त्याप्रमाणें ज्योतिष्यासहि आपल्या आश्रयदात्यांचें भविष्य बुद्धीचा समतोलपणा ठेवून वर्तवितां येत नाहीं. याप्रमाणें आपल्या मुलांचें अचुक भविष्य सांगणें एका दृष्टीनें अनावश्यक व दुसऱ्या दृष्टीनें अशक्य आहे.

**यमुना**--काकू, आपले जोशीबुवा हात पाहून भविष्य सांगण्यापेक्षां तोंड पाहून बोलण्यांत अधिक हुशार दिसतात, नाहीं बरें?

**वाराणशी**—यमुने, तूं किनई बोलण्यांत एकाद्या पंडितालासुद्धां हात टेंकायला लावशील. तुला नवरा तुझ्यासारखा पंडितच शोधून काढला पाहिजे.

**यमुना**—म्हणजे राजा नको असेंच ना तुमचें म्हणणें ? मला तर बाई यांत कमीपणा न वाटतां धन्यता वाटते. राजा कितीं जरी बलाढ्य झाला तरी त्याची सत्ता आपल्या राज्यापुरती. उलट पंडिताची सत्ता साऱ्या जगावर चालते.

**धुरंधर**—( एकीकडे ) असें स्पष्ट बोलणें मला राजा या नात्यानें कधींच ऐकायला सांपडलें नसतें.

**वाराणशी**—यमुने, हीं बोलणीं कुठपर्यंत ? जोंपर्यंत धुरंधरमहाराज वधूची निवड करण्याकरितां समोर आले नाहींत, तोंपर्यंतच.

**यमुना**—धुरंधरमहाराज वधूची निवड करणार ! आणि वधूला मात्र आपला वर पसंत करण्याची चोरीच ! ही लग्नाची विलायती तऱ्हाच म्हणावयाची.

**वाराणशी**—तें सारें आतां महाराजांनाच समक्ष सांग. घोडा-मैदान जवळच आहे.

**यमुना**—मी नाहीं भ्यायची मुळींच. तसाच प्रसंग आला तर मी त्यांना साफ सांगेन, कीं माझें आधींच लग्न झालें आहे.

**वाराणशी**—शर्थ झाली बाई तुम्हां शिकलेल्या बायकांची ! यमुने, तूं सांगतेस हें खरेंच का ?

**यमुना**—मनानें वरिलें म्हणजे आणखी लग्न तें काय लागायचें असतें ? मी जरी हें नसतें सांगितलें तरी जोशीबुवा सांगितल्याशिवाय थोडेच रहाणार होते !

**वारणाशी**—जोशीबुवा, सांगा बरें हिनें मनानें कोणाला वरलें आहे ?

**धुरंधर**—यांनीं हात दाखविला म्हणजे सांगतों.

**यमुना**—मी नाहीं दाखवायची हात कुणाहि परक्या पुरुषाला !

**धुरंधर**—यमुनाताई, तुम्हीं चुकतां. स्त्री कितीहि पतिपरायण असली तरी तिला कांसाराला, वैद्याला आणि ज्योतिष्याला हात दाखवावाच लागतो.

**यमुना**—वैद्याला हात दाखविल्यावांचून माणसाचें चालतच नाहीं. तसें

ज्योतिष्याचें नसतें.

**धुरंधर**—मनुष्य रोगामुळें किंवा जिज्ञासेमुळें आतुर झाला म्हणजे त्याला वैद्याचा काय किंवा ज्योतिष्याचा काय, आश्रय करावाच लागतो.

**यमुना**—वैद्याकडून भविष्य चुकवितां येतें. ज्योतिष्याकडून तें माहित करून घेतां येतें. मला दोन्ही गोष्टी नको आहेत. मला माझें भविष्य माहित आहे. तें तुम्हीं सांगून इतरांना मौज वाटेल, पण मला काय त्याचा फायदा?

**धुरंधर**—भविष्य चुकविणें किंवा कळणें याची जितकी माणसाला जरूर असते, तितकीच भविष्य दृढ करून घेण्याचीहि असते. आपण स्वत:करितां जो पति योजिला आहे, त्याचें आपणावर प्रेम आहे कीं नाहीं हें कळणें निरुपयोगी खास नाहीं.

**यमुना**—मीं एकदां तुम्हाला सांगितलें ना कीं मी हात दाखविणार नाहीं? तेंच कायमचें समजा. माझी आपली झांकली मूठ सव्वा लाखाची आहे, तीच बरी आहे. तुम्ही एवढे ज्योतिषी म्हणवितां, आणि मी हात दाखविणार नाहीं हें माहित असतां तुम्हीं मला इतका आग्रह करितां, याचें मला भारी नवल वाटतें. अशानें मला निराळयाच अर्थानें हात दाखवावा लागेल!

**धुरंधर**--(एकीकडे) भार्गवानें सांगितल्याप्रमाणें हट्टी स्वभाव आहे खराच.

**वाराणशी**--जोशीबुवा, हात न पहातां नाहीं का सांगतां येणार?

**धुरंधर**--अशीं माणसें भेटलीं तर त्यांचें भविष्य प्रश्नाच्या काळावरून काढण्याचीहि सोय ग्रंथांतून केली आहे. घटिकेचें लग्न कळलें म्हणजे प्रश्नाचें उत्तर तयार!

**यमुना**--हें मोठेंच सांगितलेंत! लग्न कोणाचें, कोणाशीं, कोणत्या मुहूर्तावर होणार हें कळलें कीं मग राहिलें काय सांगायचें!

**धुरंधर**--हं, जमलें! मी सांगतों यांनीं चिंतिलेला वर कसा आहे तो. वर्ण गोरा, रूप सुंदर, प्रकृति सुदृढ, बुद्धि असामान्य. कां, जमतें का कांहीं?

**गंगू**--जोशीबुवा, या प्रश्नाला नाहीं असें का उत्तर येणार आहे हिच्याकडून? प्रत्येक रमणीला आपला वल्लभ अगदीं याच वर्णनाचा वाटतो. याहून निश्चयात्मक असें कांहीं सांगायचें असलें तर सांगा.

**धुरंधर**--परिचय फार दिवसांचा नसावा. एका आठवड्याच्या आंतीलच

बहुधा असावा.

**यमुना**--जोशीबुवा, पुरे आतां ही थट्टा! दुसऱ्या कोणाचें नाहीं का सांगायचें भविष्य?

**गंगू**—आम्हांला तुम्ही परिचयाचा काळ सांगितलात; पण स्थळ नाहीं अजून सांगितलेंत तें?

**यमुना**—गंगूताई, पुरे कर बाई तुझा चावटपणा! जोशीबुवा, माझ्या गळ्याचीच शपथ आहे तुम्हांला आतां आणखी कांहीं बोलाल तर.

**धुरंधर**—तुमच्या कानांत सांगितलें तर?

**यमुना**—हं, त्याला कांहीं हरकत नाहीं.

**धुरंधर**—( स्वगत ) हिचें भार्गवावर प्रेम आहे कीं काय हें काढायला ही संधि बरी आहे. ( यमुनेच्या कानांत कुजबुजतो; ती दचकते. )

**वाराणशी**--( एकीकडे ) खास येथें कांहीं तरी पाणी मुरतें आहे. (उघड) यमुने, बरें झालें बाई, तूं तरी लग्नाच्या विवंचनेंतून सुटलीस. ( स्वतःशीं ) यमुनेचा तर बंदोबस्तच झाला. आतां ही कारटी त्रिवेणीच काय ती माझ्या लाडकीच्या वाटेंत विघ्न आणणारी उरली आहे. लहानपणापासून मुलांसारखी पोसली, नाहीं नाहीं ते लाड पुरविले, पण अखेर आपल्या हलक्या कुळाच्या वळणावरच जायची. हिला एकदां दूर केव्हां करीनसें झालें आहे. ( उघड ) जोशीबुवा, तुम्ही हा जो चमत्कार करून दाखविला, त्यानें माझी उत्कंठा फारच वाढली आहे. आमच्या या गंगूच्या लग्नाचें कसें काय जुळतें याची बाई मला पराकाष्ठेची काळजी लागली आहे. कराल का ती दूर?

**धुरंधर**--भविष्य सांगण्याचें माझ्या हातीं आहे, काळजी दूर करण्याचें नाहीं.

**वाराणशी**--( एकीकडे ) हे मेले लागलीच हरभऱ्याच्या झाडावर चढतात. ( उघड ) हें पहा, तशी काळजी वाटायला मला कांहीं कारणें आहेत, अशांतला कांहीं प्रकार नाहीं हो! तुम्हीच सांगा, असें रूप आणि असा बांधा असल्यावर मला काळजी कां वाटावी? पण म्हणतात ना आईचें हृदय! त्यांतून कधीं कधीं साधारणच रूपाच्या पण नटव्या आणि हलक्या कुळांतल्या पोरींनीं पुरुषांना मोह पाडल्याच्या गोष्टी कानांवर येतात, त्यामुळेंहि

जरा धास्ती वाटते. गंगू, चल ये बाई अशी जोशीबुवांच्या जवळ. ( गंगू येते ) एवढेंसें चालूनसुद्धां थकलीसना ? शर्थ झाली बाई तुझ्या नाजूकपणाची ! राजाच्या महालांतल्या गाद्या आणि रुजामे देखील तुला बोंचायचे. हा घाम तरी किती आला आहे ! अगदीं निथळून गेलीस. जोशीबुवा, या नाजूक प्रकृतीमुळें माझ्या बाळेचा अभ्यासहि तितपत झाला नाहीं. त्रिवेणीसारख्या सामान्य पण निकोर प्रकृतीच्या मुलींनीं सुद्धां तिच्यावर यावें. यमुनेला मात्र तिनें कधीं वर येऊं दिलें नाहीं.

**यमुना**--त्याला कारण माझाच हट्ट ! गुरुजींनीं सांगितला एक धडा करायला, कीं, मी दुसराच करावा !

**वाराणशी**—अलीकडे हिला शालूपैठण्याचें ओझें सोसत नाहीं, म्हणून ही बारीक पातळ नेसते, आणि पोलकीं घालते. वेणी किंवा बुचडा बांधला तर केंस आंवळ होतात म्हणून ही आपले केंस असे मोकळेच पाठीवर राहूं देते. दागिन्यांपैकीं काय तो मोत्यांचा हारच तिनें आपल्या गळयांत राहूं दिला आहे.

**यमुना**--त्यांतलें इंगित आहे ठाऊक मला. धुरंधरमहाराजांना देशी वस्तूंपेक्षां विलायती वस्तूंचीच आवड अधिक असायची. त्यांच्या विलायती उदऱ्याच्या जोडीला चोळीपेक्षां हें पोलकेंच चांगलें !

**गंगू**--चल, चावट कुठची !

**यमुना**--मी अशी दुसऱ्याकरितां आपल्या वस्त्रप्रावरणांत थोडाहि फरक करणार नाहीं. ज्याचें माझ्यावर प्रेम असेल, तो माझ्याकरितां त्यांजवरहि प्रेम करील. जो त्याच्याकरतां मला सोडायला तयार होईल, त्याचें मजवर प्रेम कसचें ?

**धुरंधर**—धुरंधरमहाराजांवर यांचें मनापासून प्रेम दिसतें.

**वाराणशी**--तें कांहीं विचारूं नका. पोरीनें अलीकडे त्याच्याकरितां जेवणहि टाकलें. सारखा त्यांचा ध्यास घेऊन बसली आहे. काय पोरीच्या नशिबीं आहे कुणाला ठाऊक ?

**धुरंधर**—सत्यसंकल्पाचा दाता तो नारायण आहे. बरें, पण इतकें प्रेम बसायला त्यांना यांनीं कुठें पाहिलें होतें कीं काय ?

**वाराणशी**—पाहणार कुठून ? त्यांचें चित्र आणि लोकांच्या तोंडची

वर्णनें यांनींच हिला वेड लाविलें आहे.

**धुरंधर**—मोठा चमत्कारच म्हणायचा !

**गंगू**—हं, जोशीबुवा, पाहतां माझा हात, कीं मी दूर होऊं ?

**धुरंधर**—( गंगूचा हात पहात स्वगत ) कोणाचेंही अनुकूल भविष्य सांगितलें म्हणजे त्याजवर त्याचा पक्का विश्वास बसतो. ( उघड ) आयुर्मान बरेंच मोठें दिसतें.

**गंगू**—इश्श ! श्रीमंतांपेक्षां गरिबांनाच औक्ष अधिक असतें.

**यमुना**--जोशीबुवा, नुसतें मोठें आयुष्य ही कांहीं महत्वाची गोष्ट नाहीं. तें सुखाचें कीं दु:खाचें, हें पहिल्यानें कळले पाहिजे.

**धुरंधर**--हो, हेंहि खरेंच. उत्तरध्रुवाच्या रात्रीपेक्षां भूमध्यरेषेवरील दिवस पुरवला. मातु:श्रींचें सुख बरेंच दिसतें.

**वाराणशी**--हातच्या कांकणाला आरसा कशाला ?

**धुरंधर**--पित्याचें सुख फारसें दिसत नाहीं.

**वाराणशी**--जोशीबुवा, तुम्हांलाहि हें कळून आलें ना ? तें सुख नाहीं खरेंच हो ! खरें पाहूं गेलें तर अशा सोन्यासारख्या मुलीला चांगलें स्थळ मिळविण्याची त्यांनीं नको का हो खटपट करायला ? पण स्वभाव अगदींच आळशी आणि तुसडा पडला.

**धुरंधर**--बाईसाहेब, आपण आहांत तोंपर्यंत त्यांना कशाला काळजी वहायला पाहिजे ? आपण सगळें पहातच आहांत. यांचा विवाह राजघराण्यांत होण्याचा योग आहे.

**वाराणशी**--तुमच्या तोंडांत साखर पडो ! पण हें भाकीत जरा गुळमुळीतच झालें. राजाशीं लग्न होण्याचा कांहीं योग आहे का, हें स्पष्ट कळूं द्या. नाहीं तर धुरंधरमहाराजांचे भाचे पार्थिवराजहि राजघराण्यांतलिच आहेत.

**धुरंधर**--तें तूर्त कांहींच सांगतां येत नाहीं. यत्नसाध्य आहे, हें मात्र खरें.

**वाराणशी**--यत्नसाध्य असेल तर त्याबद्दल खात्रीच आहे म्हटलें तरी चालेल. कारण आम्ही यत्न करायला कांहीं कमी का करणार आहोंत ? बाळ, दूर हो आतां, आणि अशी हिरमुसली नको होऊंस गडे !

**धुरंधर**--आतां कोणाकोणाचा हात पहायचा राहिला आहे ? त्रिवेणीचा हात पाहूं ?

**वाराणशी**--तिचा काय हात पहायचा आहे ? असेल दहाजणींसारखा. आणि त्यातून घरकाम करून तिच्या हाताला ओरखाडेहि पडलेले असायचे. धड रेघा दिसायच्याहि नाहींत. ( विचार केल्यासारखें करून ) पण थांबा अं, पहाच तिचा हात. ( त्रिवेणी धुरंधराच्या पुढें बसते. धुरंधर तिचा हात पाहूं लागतो. ) त्रिवेणी, तुझा हात असा कांपतो आहे कां ? अशी भिऊं नकोस. तुला नवरा असा हुषार कारकून पाहून देऊं, कीं कुटुंबाचें पोट भरून दरमहा दोनचार रुपये मागेंहि टाकील.

**धुरंधर**--( एकीकडे ) हा हात किती स्निग्ध आहे, आणि हा चेहरा तरी लाजेनें किती मोहक दिसत आहे ! हिचीं हीं जाडीभरडीं वस्त्रें हिला कशींशींच दिसतात. तलम रेशमी वस्त्र ज्याप्रमाणें गोणपाटांत गुंडाळावें, त्याचप्रमाणें हिच्या नाजूक शरीराला वांड नेसावलेला आहे.

**वाराणशी**--हं, जोशीबुवा, तुम्ही तोंडाकडे फार वेळ पहात राहिलांत !

**धुरंधर**--हातावरून ज्या गोष्टीचा निर्णय करतां येत नाहीं, तिचा तोंडावरून कधीं कधीं तावडतोब करितां येतो.

**त्रिवेणी**--( एकीकडे ) यांच्या हातांत हात दिल्यापासून मला जन्मांत लाधलें नाहीं इतकें सुख होत आहे; आणि असें वाटतें, कीं हाताप्रमाणें आपलें सारें जीवितहि यांच्याच स्वाधीन करावें; पण मला अभागिनीला हे विचार कशाला ? आज चार दिवस मी हे विचार दाबून टाकायला पाहतें आहें; पण संधि मिळतांच ते अगदीं उच्छृंखल झाले.

**धुरंधर**--हिला आईबापांचें मुळींच सुख मिळालेलें दिसत नाहीं.

**वाराणशी**--कुठून मिळणार ? लहानपणींच पोरकी झालेली ही पोर, आमच्या यजमानांनीं यात्रेला गेले असतां लांबची नातेवाईक म्हणून जवळ बाळगिली, आणि पोटच्या लेंकराप्रमाणें वाढविली. हे उपकार ही कसे फेडते तें मात्र पहायचें आहे.

**धुरंधर**--( चपापून एकीकडे ) काय ? हिच्या हातावर राजचिन्हे !

**वाराणशी**--कां ? चपापलेतसे ? कांहीं वाईट दिसलें असेल तर बोलून

ठेवूं नका. आमच्या त्रिवेणीला कांहीं वाटणार नाहीं. मोठी धीराची आहे हो!

**धुरंधर**--तसें नाहीं. म्हटलें हिलाहि राजयोग आहे.

**वाराणशी**—हिला आणि राजयोग? खास तुमची दृष्टि चकली! हिला जर राजयोग तर आमच्या म्हाळसेला कां नसावा? तुम्हांला वाटतें, कीं आपण अजून गंगूचाच हात पहात आहोंत. अथवा तुम्हीं म्हणतां तेंहि खरें असेल. आमची गंगू एकदा राणी झाली म्हणजे ती आपलें वजन खर्च करून त्रिवेणीचें पार्थिवराजाशीं लग्न जुळवायला मागेंपुढें पहाणार नाहीं. माझी बाळ मनानें मोठी उदार आहे. मग तें औदार्य कोणाला दाखवावें आणि कोणाला दाखवूं नये, याचेंहि भान तिला राहात नाहीं.

[ खंडेराव प्रवेश करितो. ]

**खंडेराव**—( स्वतःशीं ) तायताच्या पोरीचा ठावठिकाना आजपोतुर लई जड लागत व्हता; पन त्येच्या बरूबर त्ये सोंगाड्याचा पत्त्या लावायाचं कामबी माज्याकड आलं, ह्ये लई ब्येस जालं. आता व्होव तसं घुसा, कोन त्योक बोलनार? वरं, काय त्ये सोंगाड्याला म्हनत्यात बरं? हं, तायत्या,—न्हव तोयत्या.

**वाराणशी**—यावें कोतवालसाहेब. कशी काय महाराजांकडची खबर? खुशाल आहेत ना?

**खंडेराव**—हैत म्हनायच, न्हाइतर काय?

**वाराणशी**—( भयानें ) म्हणजे?

**खंडेराव**—त्येंच्यावर जरा हाय परसंग.

**गंगू**—म्हणजे? बोला तरी लवकर!

**खंडेराव**—योक तोयत्या म्हाराजांची गादी अंगाखाली घालाया पगतुया. चेऱ्याम्होऱ्यानं अक्षी महाराजावानीच दिसतुया म्हनत्यात. त्येचा डाव फसवाया म्हाराजानीबी आपल्या भोवतालन अक्षी खडा प्हारा ठिवलाया.

**वाराणशी**—मग तुमची त्यांची गांठ पडली नाहीं म्हणायची?

**खंडेराव**—ह्यो गडी त्येंची गांट घ्येतल्याबिगर येनार व्हय? अव गांटचिं काय, पन म्हाराज माज्यासंग दोन सबूद बोललबी!

**वाराणशी**—तें कसें काय? सांगा सगळें आम्हांला.

**खंडेराव**—योक प्हारवाला माजा व्हता दोस्त. त्येला दिली जरा मदत.

**वाराणशी**—त्याची मदत घेतली म्हणतां ?

**खंडेराव**—तसं न्हव. त्येला मदत दिली–पाजली. आन् जवा का त्यो गडी झिंगलाय तवा दिली त्येला झुकांडी, आन् जिन्यामंदी जाऊन न्हायलो उबा; आन् जवा म्हाराज जिना उतराया लागल तवा म्हनत्यात कस, " कोनर त्यो हरामखोर उबा हाय ततं ? " म्या जो म्हनता सूबाल्या हाकला, तो त्ये शेरच गांटलं.

**वाराणशी**—वा:, महाराज चांगलेच गोड शब्द बोलले तुमच्याशीं !

**खंडेराव**—बोलल त सई !

**धुरंधर**—( एकीकडे ) काय गप्पीदास आहे पहा ! ( उघड ) तुम्हीं महाराजांना पाहिलें म्हणतां, ते माझ्यासारखे दिसतात का ?

**खंडेराव**—( एकांकडे ) ह्ये मोठी पचाइत आलीया, पन् ह्यो मरद काय दाद येनार ह्येला ? (उघड) काय म्हंटलसा ? तुमच्यावानी म्हाराज दिसत्याती म्हून ? व्हय दिसत्याती. दोगांचीं त्वांडं यकावानी येक. वाईच अंतर हाय बगा. त्येंचा मुखडा दिसतुया अक्षी मदन्यावानी, आन् तुमचं मुस्काट दिसतया घुबडावानी !

**धुरंधर**—बरें, ऐट तरी ?

**खंडेराव**—त्येंची मरदावानी, आन् तुमची हाय मुर्दावानी !

**त्रिवेणी**—( एकीकडे ) काय मेला तोंडास येईल तें बरळत सुटला आहे !

**गंगू**—कोतवालसाहेब, तुमच्यासारख्या शिपाईगड्याचें बोलणें असतें जरा स्पष्ट. पण त्यांत तथ्य कांहीं कमी नसतें हो !

**खंडेराव**—बाईसाहेब, तोयत्यासमंदानं काय बंदुबस्त कराया व्होवा, त्ये आपनास्नी आन् या गंगूताईस्नी आन् या यमुनाताईस्नीबी मला सांगायचं हाय. त्ये येकांद्या भलत्या मनुक्षाम्होर सांगायचं वंगाळ. ( एकीकडे ) इक्ती हुशारी ठिवल्याबिगार कसं व्हनार ?

**वाराणशी**—चला आपण तिकडे जाऊं.

[ धुरंधर आणि त्रिवेणीशिवाय सर्व जातात. ]

**धुरंधर**—( स्वतःशीं ) मला नेहमीं तोंडदेखली मिठीं भाषणें ऐकायची संवय. त्यामुळें हीं कठोर भाषणेंहि नाविन्यामुळें कशीं गोड वाटत आहेत ! तीं

ऐकून त्रिवेणीला जें दुःख झालेलें दिसलें, त्यामुळें तर तीं भाषणें मला अमृततुल्य वाटलीं.

**त्रिवेणी**—आपणाला फार वाईट वाटलें असेल नाहीं ?

**धुरंधर**—तूं आहेसच का येथें उभी ? मला वाटलें, कीं मी अगदीं एकटाच आहें.

**त्रिवेणी**--एकट्याला दुकटें असलें म्हणजे दुःखांत सुख वाटतें, नाहीं ?

**धुरंधर**--आणि तुझ्यासारखी सांत्वन करणारी असली म्हणजे तें दुःख सुखमयच होऊन जातें. या घरांतील सगळ्या माणसांनीं जरी निंदेच्या तुफान वाऱ्यानें माझ्या हृदयसमुद्राला हालवून सोडलें, तरी तुझा एक स्नेहयुक्त शब्दच त्याचें शमन करण्यास समर्थ आहे. मला त्यांचा विशेषेंकरून राग येतो तो तुझ्यासाठीं. तुझ्यासारख्या गरीब गाईशीं अशी कसायासारखी करणी करायला त्या वाराणशीला लाज तरी कशी वाटत नाहीं ?

**त्रिवेणी**--त्यांच्यावर असें रागावूं नये. त्यांनीं मला आजपर्यंत खरोखरच पोटच्या मुलीसारखें केलें. अलीकडे मात्र मी कदाचित् गंगूताईच्या सुखाच्या आड येईन, अशी शंका येऊन त्या मला बरें पाहीनातशा झाल्या आहेत. त्यांना वाटते, मी धुरंधरमहाराजांच्या दृष्टीस पडलें, कीं ते गंगूताईस सोडून माझाच स्वीकार करतील. वास्तविक पाहिलें तर गंगूताई माझ्यापेक्षां कितीतरी श्रेष्ठ आहे ! तिचें रूप कुणीकडे आणि माझें कुणिकडे ! जमीनअस्मानाचें अंतर !

**धुरंधर**—तुमच्या रूपांमध्यें आहे खरें जमीनअस्मानाचें अंतर !

**त्रिवेणी**—पण तें काकूंना कुठून दिसणार ? त्यांचें कितीही झालें तरी आईचें हृदय. त्याला अशा हजारों नसत्या शंका आल्या तर नवल नाहीं. याबद्दल मला त्यांची कींव मात्र येते, राग मुळींच येत नाहीं. मला जरी देवानें आईच्या प्रेमाचा अनुभव घेऊं दिला नाहीं, तरी त्याची योग्यता मी जाणून आहें.

[ दुर्गा-एका ]

**हें प्रेम अंध सकलचि जगिं दिसताहे ॥ धृ० ॥**
**जननीचें परम अंध । तिळभरि नच त्या बंध । कधिं राहे ॥ १ ॥**
**बालक जरि दोषराशि । गुणखनि गमतें तिजसि । परि मोहें ॥ २ ॥**

काकूंनीं गंगूताईच्या हितासाठीं माझें कितीहि नुकसान केलें, तरी मी

यांना मनापासून क्षमा करीन.

**धुरंधर**—तुझ्या बोलण्यावरून कोणास असं वाटेल, कीं वाराणशीबाईंनीं तुला आजपर्यंत अत्यंत प्रेमानेंच बागविलें. आणि म्हणून तूं त्यांचा इतका कैवार घेत आहेस. जों जों तुझे त्यांच्यासंबंधानें उदारपणाचे उद्गार ऐकावे, तों तों त्यांच्याबद्दल कींव उत्पन्न होण्याऐवजीं संताप मात्र वाढत जातो. अशा देवमाणसाशीं अशी राक्षसी वर्तणूक? स्त्री पडली म्हणून अधिक बोलतां येत नाहीं.

**त्रिवेणी**--तुम्हीं काकूंकडे माझ्या दृष्टीनें पहाल, तर तुम्हांला त्यांचा राग येणार नाहीं.

**धुरंधर**--तुझ्या दृष्टीनें पाहूं? तुझ्या दृष्टीनें जगाकडे पाहिलें तर त्याला स्वर्गाचें स्वरूप येईल.

[ शंकरा-झपताल ]

**परिसापरी। हिणकसा बहुमोल।**
**तव हा शुभ कटाक्ष स्पर्शमात्रें करी ॥ धृ० ॥**
**करित उपवन वना। सुजन कुजना तेंवि।**
**निष्पाप धरणीसि दुरितमय ती जरी ॥ १ ॥**

तुझी दृष्टी कावळ्यास कोकिळ बनवील, आणि गारगोटीस हिरकणी करील. तुझ्या दृष्टीला जगांत स्वतःशिवाय वाईट असें काय दिसतें? तुला हा जो बांड नेसायला दिला आहे, तो तुला शालूप्रमाणेंच भासत असेल, नाहीं? त्रिवेणी, मला तुझ्या दृष्टीनें पाहतां येत नाहीं, याची क्षमा कर.

**त्रिवेणी**— त्यांना वाटतें, मला राज्याचा लोभ आहे. पण माझी इच्छा किती मर्यादित आहे, हें त्यांना कसें कळावें? धुरंधरमहाराजांशीं मी लग्न करणार नाहीं अशी शपथ जरी मीं वाहिली, तरी तें त्यांना खरें वाटणार नाहीं.

**धुरंधर**—आणि अशी भलती शपथ मी तुला घेऊंहि देणार नाही.

**त्रिवेणी**—( एकीकडे ) एकूण यांची इच्छा मी त्यांच्याशीं लग्न करावें अशींच दिसते. माझें दुर्दैव, दुसरें काय?

**म्हाळसा**—( प्रवेश करून )—अव जोशीबुवा, तुमास्नी काकूबाय घरामंदी बिगिबिगी हुटकत्याती. [ धुरंधर जातो. ]

**धुरंधर**—पार्थिवा, तुझ्याकडून माझा जरी छळ झाला असला, तरी तो माझ्या काल्पनिक वधाबद्दल सूड उगविण्याच्या इच्छेनेंच झाला ना? त्यांत तुला वैतागण्याचें कांहीं कारण नाहीं. मग सोडतोसना आपला हेका?

**पार्थिव**—धुरंधरा, मी तुझ्या इच्छेच्या बाहेर नाहीं.

**धुरंधर**—तूं माझ्याकरितां आपला आग्रह सोडिलास, यानें मला फार समाधान झालें. ( स्वत:शीं ) पण हें दुसरें प्रकरण मात्र इतकें सोपें नाहीं. ( उघड ) भार्गवा, तूं मला आज प्राणदान दिलेंस, व या प्रकारें पर्यायानें तूं आपल्या बहिणीच्या सुखालाहि कारणीभूत झाला आहेस. शिवाय तूं तिच्या मार्गांत ज्या अडचणी आणल्यास, त्यांनींच मला तिच्या प्रेमाची कसोटी पाहण्याच्या कामीं मदत झाली ना? आतां तिच्या व माझ्या योगाला तुझें प्रत्यक्ष साहाय्य झालें नाहीं खरें; पण हें व्यंग दूर करण्याचा एक उपाय आहे.

**भार्गव**—तो कोणता?

**धुरंधर**—तुझें जरी त्याला साहाय्य झालें नाहीं, तरी यमुनेचें भरपूर झालें आहे. त्याचें अर्धें श्रेय तुला प्राप्त करून घ्यायचें असेल, तर तिला अर्धांगी करण्याला तुझी तयारी पाहिजे.

**भार्गव**—आपण सुचवितां, हा एकच मार्ग आहे खरा यांतून सुटण्याचा! मी आपली सूचना मान्य करतों.

**धुरंधर**—हे मजवर तुझे मोठे उपकार आहेत.

**श्रीपति**—म्हाराज, मालकांच्या लग्नासंग आमचबी लगान जालं, तर लई खुशी पैदा व्हईल.

**धुरंधर**—( हंसून ) एकनिष्ठ सेवकांचा संतोष तोच आमचाहि संतोष!

**भार्गव**—ताई, माझ्या दुर्दैवानें या साऱ्या नाटकांत मला तुझ्य शीं प्रतिकूल होण्याची जरी बुद्धि झाली तरी तुजविषयींच्या माझ्या निर्मळ प्रेमाकडे दृष्टी देऊन तूं मला क्षमा करशील ना?

**त्रिवेणी**—दादा, माझें पुढील वर्तनच तें आपोआप सिद्ध करून दाखवील.

**वाराणशी**—महाराज, त्रिवेणी कांहीं झालें तरी मला माझ्या गंगूसारखी आहे. तिचें कल्याण झालें, यांत मलाहि आनंदच आहे. आपल्या आग्रहानें पार्थिवराजांनीं आपला अरण्यवासाचा हेका सोडला, हेंहि आपले आमच्यावर

मोठे उपकार झाले. पण गंगूबद्दल आपण जें भाकित केलें होतें, तें अजून पुरें झालें नाहीं. ही गोष्ट आपल्यासारख्या सत्यव्रत राजांना सलल्यावांचून रहात नसेल.

**धुरंधर**—राजयोगाबद्दलचेंच भाकित ना? तें माझ्या पूर्णपणें लक्षांत असून, तुमची सूचना होण्यापूर्वींच मी त्याच्याविषयीं एक योजनाहि केली आहे. माझ्या राज्यापैकीं एक मोठा प्रांत स्वतंत्रपणें पार्थिवाला तोडून दिला जाईल, या योजनेला सार्वभौम सरकारची अनुमति मागण्यासाठीं मी ताबड-तोब खलिता रवाना करतों.

**वाराणशी**—देव आपणाला उदंड आयुष्य देवो! आपणाला राज-ज्योतिषी म्हणावें, कीं ज्योतिषराज म्हणावें, हेंच कळत नाहीं.

**धुरंधर**—पार्थिवा, भार्गवा, आपणापैकीं प्रत्येकाचे हेतु त्या जगन्नि-यंत्याच्या इच्छेनें पूर्ण झाले आहेत!

**राणी**—तुमचे संकल्प दृढ करण्याला विवाहबंधनाचीच काय ती आवश्य-कता आहे. तुमची हरकत नसेल, तर पहिल्याच मुहूर्तावर तुम्हां सर्वांना चतुर्भुज करून टाकूं. आणि खरोखर या संसारांत अनुरूप वधू मिळून तिच्या पाशांत बद्ध होऊन राहण्यांत जितकें सुख आहे, त्याच्या शतांशहि सुख स्वतंत्र राहण्यांत नाहीं, याचा तुम्हांला स्वानुभयानें प्रत्यय येवो, येवढेंच माझें ईश्वरापाशीं मागणें आहे.

**सर्व**—तथास्तु!

## —भरत वाक्य—

**नच तुलना तुजला प्रभो असे। सदृश असें जगिं न दिसे ॥ ध्रु० ॥**

**श्वसित आम्ही, तेंवी हें जग तुझें।**

**नच उपमा कसली कुणी द्यावया धजे।**

**श्रुतिहि अंतिं वदति नेति ॥ १ ॥**



Cover and Block printed at the 'KAMALA PRINTING COTTAGE' Dadar